2010110118531800१

**पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका**
आस्थापनेवर अंतर्गत लेखा परीक्षणसाठी "उपमुख्य लेखापाल" (अंतर्गत लेखा परिक्षक ) या अभिनामाचे पद निर्माण करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीसी-३००५/३००७/प्रक्र-२१५/२००५/नवि-२२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक: १३ ऑक्टोबर,२०१०

वाचा : १) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/कावि/४९१/०५, दिनांक २१.७.२००५ व त्यासोबतचा महासभा ठराव क्र.५३८१, दि.२०.२.२००५
२) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१ अ/कावि/ २७६/ २००६, दिनांक १३.३.२००६
३) या विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण १००५/वर्गीकरण/प्र.क्र.३७९/०५/नवि-२४, दि.४.५.२००६
४) सहायक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/७६०/ २००८, दिनांक ३.७.२००८
५) सहायक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/८९९/ ०८, दिनांक ७.८.२००८
६) सहायक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/१०८१/ २००८, दिनांक २२.१०.२००८
७) सहायक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/७०३/ २००९, दिनांक ६.११.२००९
८) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/७९८/ २००९, दिनांक १६.१२.२००९
९) सहायक आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/२१७/ २०१०, दिनांक १५.३.२०१०

प्रस्तावना: पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका महासभा ठराव क्र.५३८१,दिनांक २०.२.२००५ ला अनुसरुन आयुक्त,पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "अंतर्गत लेखा परिक्षक" या अभिनामाचे १०६५० - १५८५०/- या वेतनश्रेणीतील एक पद नव्याने निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. आयुक्तांनी सदर प्रस्ताव सादर करताना पुढीलप्रमाणे वस्तुस्थिती नमूद केलेली आहे.

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील तरतूदीप्रमाणे मुख्य लेखा परिक्षक व त्यांच्या अधिनस्त असलेल्या लेखा परिक्षण विभाग हे स्थायी समितीच्या निर्देशानुसार

आयुक्त व त्यांच्या अधिनस्त् संपूर्ण प्रशासकीय यंत्रणेचे लेखा परिक्षण स्वतंत्रपणे करीत असतात. त्यांनी प्रशासकीय यंत्रणेचे लेखापरिक्षण पार पाडणे अपेक्षित आहे.

आयुक्त व प्रशासकीय यंत्रणेच्या दैनंदिन वित्तीय बाबींची तपासणी करणे, मागण्या, देयके इ. यांची तपासणी करणे व आयुक्तांना वित्तीय निर्णय घेण्यास मदत करणे याकरिता वेगळी स्वतंत्र यंत्रणा असणे आवश्यक आहे. या दृष्टीने अंतर्गत लेखापरिक्षक हे पद महानगरपालिकेच्या आस्थापनेवर आवश्यक ठरते व त्यांचे अधिनस्त विभागामार्फत वरीलप्रमाणे तपासण्या अंदाजपत्रकीय बाबींचे नियंत्रण निविदा प्रक्रिया योग्य पध्दतीने पार पाडली आहे काय, यांची तपासणी भांडार व साठे यांची नियमित मोजदाद महालेखाकार व इतर लेखापरिक्षणाचे अनुपालन इ. जबाबदा-या सोपवाव्या लागतील व म्हणून "अंतर्गत लेखापरिक्षक" हे पद आवश्यक असून वाढत्या व्यवहारावर आर्थिक नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. तसेच सदर महानगरपालिकेचा सध्याचा आर्थिक व्याप पहाता अंतर्गत लेखापरिक्षक हे पद रु.१०६५०-३२५-१५८५० या वेतनश्रेणीत निर्माण करणे आवश्यक आहे. लेखापरिक्षण विभाग हे स्थायी समितीचे निर्देशनानुसार काम करत असतो, तर प्रभाग अधिकारी, आयुक्त व त्यांच्या अधिनस्त संपूर्ण स्वतंत्रपणे काम करीत असतात. अंतर्गत लेखापरिक्षणानुसार प्रशासकीय निर्णयात सहभागी न होता हे लेखापरिक्षण पार पाडणे अपेक्षित आहे. म्हणून "अंतर्गत लेखापरिक्षक" हे पद आवश्यक असून वाढत्या व्यवहारावर आर्थिक नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने ते निर्माण करणे गरजेचे आहे.

सबब मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ४७ मध्ये नमूद कर्तव्य व जबाबदारी पार पाडण्यासाठी पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "उप मुख्य लेखापाल" तथा " अंतर्गत लेखा परिक्षक" या अभिनामाचे रु. १०६५० ते १५८५० या वेतनश्रेणीतील "एक पद" नव्याने निर्माण करणे आवश्यक असल्याचे आयुक्तांनी त्यांचे प्रस्तावात नमूद केलेले आहे. त्याअनुषंगाने सदर आयुक्तांचे प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय :-

पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका महासभा ठराव क्र. ५३८१, दि.२०.२.२००५ ला अनुसरुन, आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील तपशिल विचारात घेवून, अंतर्गत लेखा परिक्षण विषयक कामांसाठी महानगरपालिका आस्थापनेवर "उपमुख्य लेखापाल ( अंतर्गत लेखा परिक्षक)" या अभिनामाचे रु.१०६५० ते १५८५० या वेतनश्रेणीतील "एक पद" खालील शैक्षणिक अर्हतेत निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ चे कलम ५१(४) आणि कलम ४५७(३) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर पदाची भरती पध्दती आणि शैक्षणिक अर्हता व पात्रता खालीलप्रमाणे राहील :-

(अ) भरती पध्दती - सरळसेवा/ पदोन्नती /प्रतिनियुक्तीने.

(ब) शैक्षणिक अर्हता व पात्रता

१) सरळसेवेने :-

(अ) महापालिका सेवेत असल्यास वय वर्षे ३५ पेक्षा जास्त नसावे.

(ब) कला,वाणिज्य किंवा सायन्स शाखेचा पदवी उत्तीर्ण

टिप - मान्यता प्राप्त विद्यापिठाचा अर्थशास्त्र आणि गणित विषयासह कला शाखेचा पदवीधर, गणित विषयासह विज्ञान शाखेचा पदवीधर, अकाऊन्टस व ऑडीट विषयासह वाणिज्य पदवीधरास प्राधान्य. केंद्र सरकारच्या स्टेट अकाऊन्टस सर्व्हीस उत्तीर्ण असणा-यांना प्राधान्य. राज्य शासनाच्या महाराष्ट्र फायनान्स अकाऊन्टस सर्व्हीस परीक्षा, विधी शाखेची पदवी ही अतिरिक्त अर्हता समजण्यात येईल.

(क) शासन, स्वायत्त संस्था किंवा शासकीय उपक्रमाच्या ऑडिटर किंवा अकाऊन्टस मधील जबाबदारीच्या पदावरील सलग किमान ५ वर्षाचा अनुभव

किंवा

२) पदोन्नतीने :-

(अ) गणित किंवा अर्थशास्त्र विषयासह कला शाखेचा किंवा गणित विषयासह शास्त्रशाखेचा किंवा वाणिज्य शाखेचा पदवीधर

टिप - अकाऊन्टस व ऑडीटींग या विषयासह वाणिज्य पदविकाधारकास प्राधान्य

(ब) महानगरपालिकेतील उपमुख्य लेखा परिक्षक किंवा लेखाधिकारी या पदाच्या कामकाजाचा सलग किमान १० वर्षे अनुभव

किंवा

३) प्रतिनियुक्तीने :-

शासन सेवेतील समकक्ष वित्त व लेखा अधिकारी संवर्गातुन प्रतिनियुक्तीने

०३. या आदेशानुषंगिक सर्व बाबींची पूर्तता आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी पूर्ण करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन, मलबार हिल,मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास विभाग ), मंत्रालय,मुंबई
४) मा.सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
६) सहायक आयुक्त(प्रशासन), पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
७) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
८) निवडनस्ती (नवि-२२ )

-----------------------------XXXX---------------------------------